

# ॲब लिंकन

## यांचे प्राण्यांवर प्रेम होते

लेखिका: एलेन जॅक्सन

चित्रे: डोरिस एटलिंगर

# ॲब लिंकन

## यांचे प्राण्यांवर प्रेम होते



मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



फार फार वर्षांपूर्वी, अमेरिकेच्या *केंटकी* राज्यातील जंगलात एक मुलगा राहात होता. त्याचे प्राण्यांवर फार प्रेम होते.

वसंत ऋतुत त्या मुलाने, *अब्राहम लिंकन*ने, एक कोल्हीण आणि तिची पिल्ले पाहिली. शरद ऋतुत त्याने जंगलात ओकची फळे गोळा करणारा *रॅकून* हा प्राणी पाहिला.

लहान वयातच अब्राहमला उमगले की प्राण्यांनाही वेदना, आनंद या भावना जाणवतात आणि त्यांचेही स्वतःचे असे आयुष्य असते.



अब्राहमचे कुटुंब आधी केंटकीत राहात. नंतर ते इंडियाना राज्यात, एका शेतावर राहू लागले. अब्राहम आणि त्याची बहीण *सारा* पाणी आणत आणि लाकूड कापत. ते आईला पेरणीत आणि धान्याचे पीठ करण्यात मदत करत. अब्राहमचे वडील बऱ्याचदा ससा वा हरणाची शिकार करून आणत. त्या काळात, सीमेवर राहाणाऱ्या लोकांना प्राण्यांची शिकार करणे आवश्यक असे. पोटाची भूक भागवण्यासाठी प्रत्येकालाच कष्ट करावे लागत.



अब्राहम मोठा झाल्यावर त्याने घर चालवण्यात मदत करावी अशी अपेक्षा त्याचे कुटुंबीय करू लागले. एकदा, त्याला काही रानटी टर्की पक्षी दिसले. त्याने बंदुकीने नेम धरून त्यांतील एका पक्ष्याला ठार केले. पण त्या जखमी पक्ष्याला पाहून त्याचे मन खूप दु:खी झाले. त्याने मनाशी निश्चय केला की यापुढे कधीही शिकार करायची नाही. त्याने आपले हे वचन आयुष्यभर पाळले.

इतर मुले बऱ्याचदा प्राण्यांना त्रास देत असत, पण अब्राहमने असे कधीच केले नाही. एकदा शाळेत मुलांनी एका कासवाच्या पाठीवर जळते कोळसे ठेवले. त्यावेळी अब्राहमला आपले तोंड उघडावे लागले, त्या मुलांना थांबवावे लागले.

“प्राण्यांशी क्रुरतेने वागू नये,” तो मुलांना म्हणाला. “अगदी मुंगीलासुद्धा आपल्या आयुष्याचे मोल असते.”









तरुण वयात अब्राहम *इलिनॉय* राज्यातील *स्प्रिंगफिल्ड* शहरात आला. तिथे तो वकील म्हणून काम करू लागला. तो फक्त वीस वर्षांचा असताना त्याने एक भाषण दिले. त्याने श्रोते इतके प्रभावित झाले की ते भाषण एका वृत्तपत्रात छापून आले आणि अब्राहमकडे शहरातील महत्त्वाच्या लोकांचे लक्ष गेले. त्याचे दिवस व्यस्त होत गेले. तरीही तो प्राण्यांना मदत करण्यासाठी जरूर वेळ काढत असे.

एके दिवशी तो आणि त्याचे मित्र घोड्यावर स्वार होऊन कुठेसे चालले होते. ते आलुबुखार आणि सफरचंदाच्या राईतून जाऊ लागले. पण मध्येच अब्राहम थांबला. कुणा पक्ष्याची दोन छोटीशी पिल्ले वाऱ्याच्या झोताने घरट्याबाहेर पडली होती.

अब्राहम घोड्यावरून उतरला. त्याने छोट्याशा पक्ष्यांना उचलून घेतले. मग झाडावर चढून त्याने ती पिल्ले त्यांच्या घरट्यात ठेवून दिली.

"काय मूर्खपणा चालवलाय!" अब्राहमचा मित्र *जोशुआ स्पीड* म्हणाला. "कपडे खराब करून घेतलेस बघ स्वतःचे."

"मी या पिल्लांना मदत केली नसती तर मला रात्रभर झोप लागली नसती.," अब्राहम हळुवारपणे बोलला. आपले मित्र आपल्यावर हसत आहेत, याची अब्राहमला पर्वा नव्हती.



ई.स. 1839 मध्ये, एका नृत्यादरम्यान, अब्राहमची भेट प्रेमळ आणि धाडसी *मेरी टॉड*शी झाली. तीन वर्षांनी, दोघांनी लग्न केले. पुढल्या अकरा वर्षांत, त्यांना मुले झाली: *रॉबर्ट, एडी, विली* आणि *टॅड.*

अब्राहमच्या घरात मांजरी, कुत्रे आणि त्यांच्या पिल्लांसाठी पुरेशी जागा होती. त्याला आणि त्याच्या मुलांना जंगलात भटकायला आणि तिथे फुलपाखरे, किटक, दगड शोधायला आवडत असे.

अब्राहम वकिली कामासाठी जवळच्याच शहरांमध्ये जात असे. तो आपला आवडता घोडा, *ओल्ड बॉब*वर बसून प्रवास करत असे. प्रवास पूर्ण झाल्यावर, तो बॉबचे पाय तपासत असे, त्याला गाजर खायला देत असे आणि त्याचे नाक कुरवाळत असे.



पुढे *फिडो* नावाचा लटकत्या कानाचा एक कुत्रा लिंकन कुटुंबासोबत राहू लागला. अब्राहम आणि फिडो एकत्र बाजारात जात. फिडो पार्सल आपल्या तोंडात धरून आणत असे. केस कापायला अब्राहम *बिली* सलूनमध्ये जात असे, तेव्हा फिडो शांतपणे सलूनबाहेर बसून वाट बघत असे. मुलांचा घोळका आला की फिडो त्या मुलांसोबत उड्या मारत असे, खेळत असे, अगदी अब्राहम केस कापून बाहेर येईपर्यंत!





अब्राहम काही काळ अमेरिकेच्या लोकप्रतिनिधी सभागृहाचे सदस्य होते. 1860 मध्ये, ते अमेरिकेच्या राष्ट्राध्यक्ष पदाच्या निवडणुकीत उमेदवार म्हणून उभे राहिले. निवडणूक जिंकल्यावर त्यांचे कुटुंब वॉशिंग्टन डी. सी. मधील *व्हाइट हाऊस* या शासकीय निवासात राहायला गेले.

फिडोला कुटुंबासोबत न आणण्याचा दुःखद निर्णय अब्राहमला घ्यावा लागला. वॉशिंग्टनपर्यंत ट्रेनचा प्रवास दीर्घ आणि कठीण होता. लिंकन यांच्या कुटुंबासोबत त्यांचे बरेच सामान होते.

अब्राहमने आपले एक शेजारी, *रोल्स* यांना विनंती केली की त्यांनी फिडोला सांभाळावे. त्यांनी रोल्स यांना फिडोचा आवडता सोफासुद्धा दिला.

“वचन द्या,” अब्राहम रोल्स यांना म्हणाले, “फिडो जर घाणीने माखलेले पाय घेऊन घऱात आला तर तुम्ही त्याच्यावर ओरडणार नाही. त्याला कधीही घरामागे परसात एकट्याला बांधून ठेवणार नाही. जेव्हा तो बाहेरून दरवाजा ओरबाडू लागेल, तेव्हा तुम्ही त्याला लगेच घरात घेणार.”

फिडोच्या नव्या कुटुंबाने साऱ्या अटी मान्य केल्या. देशाच्या नव्या राष्ट्राध्यक्षांना कुणी नाही कसे म्हणू शकतील! वॉशिंग्टनला निघण्यापूर्वी लिंकन कुटुंबाने फिडोचा एक फोटो काढला. त्यावेळी फोटोग्राफी कला नुकतीच सुरू झाली होती. कुणा राष्ट्राध्यक्षांच्या पाळीव कुत्र्याचा हा पहिलावहिला फोटो होता.

वॉशिंग्टनमध्ये लिंकन कुटुंबाने आपल्या नव्या घरात अनेक पाळीव प्राणी बाळगले. यात ससा, कुत्रे, मांजरी आणि अगदी बकऱ्यासुद्धा होत्या. अब्राहमच्या सर्वात धाकट्या मुलाने, *टेड्*ने एकदा या बकऱ्या एका खुर्चीला बांधल्या आणि त्यांना साऱ्या व्हाइट हाऊसभर फिरवू लागला. त्यामुळे स्वागत समारंभासाठी गोळा झालेल्या स्त्रिया इकडेतिकडे पळू लागल्या.

एका पाहुण्याने पाहिले की राष्ट्राध्यक्ष रात्रीच्या भोजनाला त्यांच्या शेजारच्या खुर्चीवर बसलेल्या आपल्या मांजरीचे खूप लाड करत होते. पाहुणा कुणालातरी म्हणाला, “तुम्हाला नाही वाटत, *टेब्बी*ला सोन्याच्या चमच्याने भरवणं हे श्रीयुत लिंकन यांच्या पदाला शोभेसं नाही?”

यावर “अमेरिकेचे पंधरावे राष्ट्राध्यक्ष *ब्यूकॅनन* सोन्याच्या चमच्याने खायचे, मग टेब्बी का नाही खाऊ शकत!” असे अब्राहम लिंकन यांचे उत्तर होते.






नव्या राष्ट्राध्यक्षांसमोर अनेक समस्या होत्या. 1860 साली, अमेरिकेच्या काही राज्यांमध्ये गुलामगिरी प्रथा अस्तित्वात होती. इतर राज्यांमध्ये या प्रथेस मनाई होती. गुलामगिरी ही एक अन्यायकारी प्रथा होती. त्यामध्ये गोरे लोक काळ्या लोकांना आपले गुलाम बनवत, त्यांच्याकडून बरीच कामे करून घेत आणि त्यांच्यासोबत अमानवी वर्तन करत. अब्राहम लिंकन यांनी आश्वासन दिले होते की भविष्यात जो प्रांत अमेरिकेचे राज्य बनेल त्या राज्यामध्ये गुलामगिरी प्रथेवर निर्बंध आणण्यात येतील. "काही लोक स्वतंत्र आणि काही लोक गुलाम अशी दुटप्पी परिस्थिती हे शासन कधीही सहन करणार नाही," असे लिंकन म्हणत.

अब्राहम लिंकननी निवडणूक जिंकल्यावर गुलामगिरी प्रथा प्रचलित असलेली दक्षिणेतील काही राज्ये अमेरिकेतून फुटून निघाली आणि त्यांनी आपले वेगळे सरकार बनवले. आपल्या देशाची अखंडता टिकवण्यासाठी अब्राहम लिंकन युद्ध करायलाही तयार होते.







काही काळाने, अमेरिकेत भीषण गृहयुद्ध सुरू झाले. अब्राहम लिंकन यांच्या मते देशाची अखंडता टिकवण्यासाठी गुलामगिरी प्रथा बंद होणे गरजेचे होते. 1862 साली, गुलामांच्या मुक्तिची घोषणा करण्यात आली. याद्वारे बंडखोरी झालेल्या राज्यांमधील सर्व गुलामांना स्वतंत्र घोषीत करण्यात आले. राष्ट्राध्यक्षांच्या या निर्णयामुळे अनेक लोक त्यांचा तिरस्कार करू लागले. इतर लोक मात्र लिंकन यांना एक महान व्यक्ती मानू लागले. अब्राहम लिंकन यांनी अमेरिकी सरकारला लोकांच्या स्वातंत्र्याप्रती वचनबद्ध करून मोठेच धैर्य दाखवले होते.



गृहयुद्ध सुरूच राहिले. रणांगणावर मृत सैनिकांच्या प्रेतांचा ढीग झाला, पानगळीत झडलेल्या शुष्क पानांच्या ढीगासारखा. सतत चिंताग्रस्त राहिल्यामुळे अब्राहम यांचा चेहरा खप्पड आणि निस्तेज दिसू लागला.

प्राण्यांच्या संगतीत त्यांचा मानसिक थकवा थोडासा दूर होत असे. एकदा सैन्याचे सेनापती, *जनरल ग्रँट* यांना भेटायला ते सेना मुख्यालयात जात होते. वाटेत त्यांना मांजरीची तीन पिल्ले दिसली. त्या पिल्लांच्या आईचा मृत्यू नुकताच झाला होता. लिंकन यांनी त्या पिल्लांना उचलून घेतले आणि ते त्यांना कुरवाळू लागले. ते तेथील कर्नलना म्हणाले, “तुम्ही या आईविना पिल्लांची देखभाल कराल, त्यांना वेळच्यावेळी दूध प्यायला द्याल असा मला विश्वास वाटतो.” कर्नलने पिल्लांकडे संपूर्ण लक्ष देऊ, असे आश्वासन दिले.

युद्धात मग्न असूनही, अब्राहम आपल्या मुलांसाठी वेळ काढत. एकदा ख्रिसमसच्या आधी टेडला व्हाइट हाऊसच्या बागेत फिरत असलेला एक मोठा टर्की मिळाला. टेडने त्याचे नाव *जॅक* ठेवले. त्याच्या मानेला दोर बांधून टेड त्याला व्हाइट हाऊसमध्ये फिरवू लागला आणि तेथील सर्व कर्मचाऱ्यांना भेटून दाखवू लागला.

“अरे व्वा, तुझी ख्रिसमसची मेजवानी भेटली वाटतं तुला!” टर्कीला बघून एक स्वयंपाकी म्हणाला.

काय! म्हणजे जॅकला ठार करून ख्रिसमसच्या मेजवानीसाठी शिजवणार की काय? टेड राष्ट्राध्यक्षांच्या कार्यालयाकडे पळाला. तिथे त्याचे वडील एका महत्त्वाच्या मिटींगमध्ये व्यस्त होते.

“बाबा,” टेड म्हणाला. “प्लीज, त्यांना जॅकला मारू देऊ नका. तो खूप चांगला पक्षी आहे. त्याला मारणं बरोबर नाही.”

अब्राहमनी शांतपणे त्याचे म्हणणे ऐकून घेतले. फार वर्षांपूर्वी त्यांनीही गोळी झाडून एक टर्की मारला होता. त्यांना नंतर त्याचे खूप दुःख झाले होते. ते दुःख मनातून पुन्हा एकदा जागे झाले. पण या घटनेचा शेवट वेगळा असणार होता.

“तो चांगला पक्षी आहे, टेड,” अब्राहम म्हणाले. “मी त्याला अभय देतो. शेवटी, मी राष्ट्राध्यक्ष आहे.”

मग अब्राहम लिंकन यांनी जॅकसाठी राष्ट्राध्यक्षांचा अभयनामा लिहून त्यावर सही केली. आता तो पक्षी लिंकन कुटुंबाचा सदस्य झाला.

1864 मध्ये, अब्राहम लिंकन पुन्हा चार वर्षांसाठी राष्ट्राध्यक्ष म्हणून निवडून आले. पण गृहयुद्ध समाप्त झाल्यावर, अमेरिकेचे एकीकरण झाल्यावर लगेच एप्रिल 1865 मध्ये एका माथेफिरूने गोळी झाडून अब्राहम लिंकन यांची हत्या केली. देशभरातील लोकांनी आपल्या प्रिय राष्ट्राध्यक्षांच्या मृत्यूवर शोक व्यक्त केला.

राष्ट्राध्यक्ष लिंकन यांना इलिनॉय राज्यातील स्प्रिंगफील्ड शहरात दफन करण्यात आले. प्रेतयात्रेच्या मागेमागे दिमाखदार ओल्ड बॉब घोडा चालत होता. त्याच्या गाडीला चांदीची किनार असलेली झालर होती. शोकाकुल लोकांना भेटायला फिडोलाही जुन्या घरी आणण्यात आले.



आज जगभरातील लोक अब्राहम लिंकन यांचा सन्मान करतात, कारण त्यांनी या देशाची अखंडता टिकवली आणि गुलामांना स्वतंत्र केले.

अब्राहम यांच्या प्राणीप्रेमाचे आजही स्मरण केले जाते. दरवर्षी आदरांजली कार्यक्रमात, अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष एका टर्कीला अभय देतात, अब्राहम लिंकन यांनी शंभर वर्षांपूर्वी केले तसेच!



अब्राहम लिंकन यांच्या ह्रदयात सर्व प्राण्यांना सारखेच स्थान होते, मग प्राणी मोठा असो वा छोटा. अमेरिकेच्या मूळ निवासींच्या एका दंतकथेनुसार, जेव्हा एका मनुष्याचा मृत्यू होतो तेव्हा त्याची भेट पूर्वी त्याच्याशी मैत्री असलेल्या सर्व जीवांशी होते. हे खरे असेल तर, अब्राहम लिंकन यांच्या मृत्यूनंतर हवा, पाणी आणि जमिनीवरील कित्येक प्राण्यांच्या आत्म्यांनी त्यांचे स्वागतच केले असणार.

